शिवछत्रपती क्रीडापीठ/क्रीडा संकुल, म्हाळुंगे-बालेवाडी मधील विविध क्रीडा सुविधांचे नुतनीकरण/ अद्ययावतीकरण इत्यादी कमाकरिता रु.४०३१.५९ लक्ष इतका निधी वितरित करणेबात

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः क्रीडायो २४२५/प्र.क्र.४८ /क्रीयुसे-१,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :२८/०३/२०२५

**वाचा :-**

१) आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांचे पत्र, दि.२३.०१.२०२५.
२) शासन परिपत्रक, नियोजन विभाग, क्र.ससमा २०२३/प्र.क्र.१०/२०२३/का-१४६१, दि.२०.०३.२०२४.
३) मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील उच्चाधिकार सचिव समितीच्या दि.०७.०३.२०२५ च्या बैठकीचे इतिवृत्त.
४) शासन निर्णय, शा.शि. व क्री. वि., क्र.क्रीडायो २४२३/प्र.क्र.१६९/क्रीयुसे-१, दि.२०.०३.२०२५.

**प्रस्तावना :-**

शिवछत्रपती क्रीडापीठ/ क्रीडा संकुल, म्हाळुंगे -बालेवाडी मधील क्रीडा सुविधांच्या नुतनीकरण/अद्ययावतीकरणाच्या कामांच्या एकूण रु. ४०४७.८८ लक्षच्या अंदाजपत्रकास मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील उच्चाधिकार सचिव समितीच्या दि.०७.०३.२०२५ च्या बैठकीत मान्यता प्राप्त झाली होती. त्यानुसार शिवछत्रपती क्रीडापीठ/ क्रीडा संकुल, म्हाळुंगे -बालेवाडी मधील कामे करण्यासाठी संदर्भ क्र.४ येथील शासन निर्णयान्वये अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यतेसह वित्तीय मान्यता देण्यात आली असून त्यासाठी रु.४०३१.५९ लक्ष (रुपये चाळीस कोटी एकतीस लक्ष एकोणसाठ हजार फक्त) इतका निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय:-**

शिवछत्रपती क्रीडापीठ/ क्रीडा संकुल, म्हाळुंगे -बालेवाडी मधील विविध क्रीडा सुविधाच्या इमारतीची दुरुस्ती, नुतनीकरण व अद्ययावतीकरण, विद्युतीकरण, वातानुकूलन यंत्रणेचे नुतनीकरण इ. खालील कामे करण्यासाठी रु.४०३१.५९ लक्ष निधी वितरित करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | कामाचे स्वरूप | अंतर्भूत बाबी | अंदाजपत्रकीय रक्कम (लाखात) |
|---|---|---|---|
| १ | वेटलिफ्टींग हॉल, जिम्नॅस्टिक हॉल, बॉक्सींग हॉल यांची दुरूस्ती व नुतनीकरण. | वेटलिफ्टींग हॉल | ७७.८७ |
| | | जिम्नॅस्टिक हॉल | १०४.८६ |
| | | बॉक्सींग हॉल | ५६.२८ |
| | | बॅडमिंटन हॉल | २०९.१६ |

| | | | |
|---|---|---|---|
| २ | सिंथेटिक ॲथलेटिक्स ट्रॅकचे नुतनीकरण | आंतराष्ट्रीय दर्जाचे ॲथलेटिक्स ट्रॅक | १७८२.०० |
| ३ | बिल्डींग "ए", बिल्डींग "बी", बिल्डींग "सी", बिल्डींग "डी- १ व डी-२" वसतीगृह इमारतीचे नुतनीकरण | दुरुस्ती, नुतनीकरण व इलेक्ट्रीकल्स | ३०९.८३ |
| ४ | फिटनेस सेंटरची सिव्हील, इलेक्ट्रीकल्स व इतर कामे. | इलेक्ट्रीकल, वातानुकूलन यत्राणा, फायर अलार्म, सी.सी.सी.टी.व्ही, म्युझिक सिस्टीम | २२७.१२ |
| ५ | संकुलातील विविध क्रीडा सुविधांचे विद्युतीकरणाची कामे, तसेच वातानुकूलन यंत्रणा अद्ययावत करणे. | बॅडमिंटन, जिम्नॅस्टिक, बॉक्सिंग, वेटलिफ्टिंग, टेबल टेनिस इ. ठिकाणचे एल.ई.डी. इलेक्ट्रीफिकेशन व. | ५०२.९९ |
| | | वातानुकुलण यंत्रणेची दुरूस्ती | ४२१.०५ |
| ६ | शिवछत्रपती क्रीडा संकुल, पुणे येथील ए.बी.डी-२, वसतीगृहामधील व क्रीडा प्रबोधिनी भोजनगृहामधील सुविधेमध्ये सुधारणा करणेबाबत. | होस्टेल ए, बी, डी-२ व क्रीडा प्रबोधिनी भोजनगृहाचे नुतनीकरण (स्थापत्यविषक कामे) | ३४०.४२ |
| | | एकूण रुपये | ४०३१.५९ |

२. उपरोक्त खर्च "मागणी क्र.ई-३, मुख्य लेखाशिर्ष २२०४-क्रीडा व युवक सेवा, १०४, क्रीडा व खेळ, (१६) (०१) क्रीडा संकुलांची स्थापना, ३१, सहायक अनुदान (वेतनेतर),संगणक क्र.२२०४ १७०२," या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

३. उपरोक्त मंजूरी खालील अटी/शर्तीच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

**<u>अटी व शर्ती :-</u>**

१) बांधकामाच्या प्रगतीनुसार व मान्य निकषांनुसार निधी वितरीत करण्यात यावा. ज्यावेळी निधी प्रत्यक्ष खर्च करावयाचा असेल, त्याच वेळी निधी आहरित करावा.

२) निधी ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आला आहे, त्याच प्रयोजनाकरिता खर्च करण्यात यावा. शासन लेख्याबाहेर बँक खात्यात हा निधी ठेवण्यात येऊ नये.

३) सदर कामांबाबत प्रचलित नियमानुसार स्थानिक प्राधिकरणाची पूर्व परवानगी घेण्यात यावी.

४) यासंदर्भात प्रचलित शासन निर्णय/ वित्तीय अधिकार मर्यादा व विहित निविदा कार्यपद्धतीची काटेकोरपणे अंमलबजावणी करण्यात यावी.

५) खर्च झालेल्या निधीचे सक्षम प्राधिकाऱ्याच्या स्वाक्षरीचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर करण्यात यावे.

६) सदर निधी दि.३१.०३.२०२५ पूर्वी करण्यात यावा.

४. हे आदेश वित्त विभागाने अनौपचारिक संदर्भ क्र.४४४/व्यय-५, दि.२४.०३.२०२५ अन्वये दिलेली सहमती व वित्त विभाग, शासन निर्णय, क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम (भाग-२), दिनांक २० सप्टेंबर, २०१९ सोबतच्या परिशिष्ट-अ, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उपविभाग- पाच, तसेच, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियमपुस्तीकेंतर्गत परिच्छेदांखाली प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या वित्तीय अधिकारांसंदर्भातील, अनुक्रमांक-१, परिच्छेद क्रमांक-१३४ अन्वये प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

५. यासाठी लेखाधिकारी, क्रीडा व युवक सेवा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी व आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३२८१११५४७०९२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RANSING ANANDRAO DERE

Digitally signed by RANSING ANANDRAO DERE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=9651a3c25d5e1f106e47059f72760ff520f9b00f67c3e9186e40ed4bd4fbaee6, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=41EC78BC14804BABDC24C7FD31BA9FBF63804F499D4335774E27423E40136397, cn=RANSING ANANDRAO DERE
Date: 2025.03.28 17:34:01 +05'30'

**( रणसिंग डेरे )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपालांचे सचिव,
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
३. मा.उपमुख्यमंत्री (नगर विकास) यांचे प्रधान सचिव,
४. मा.उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे प्रधान सचिव,
५. मा.सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई यांचे खाजगी सचिव,
६. मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई यांचे खाजगी सचिव,
७. मा.उपसभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
८. मा.उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
९. मा.विरोधी पक्षनेता,विधानसभा / विधानपरिषद, यांचे स्वीय सहायक, मुंबई.
१०. मा.मंत्री (क्रीडा व युवक कल्याण), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
११. सर्व मा. विधानपरिषद/ विधानसभा सदस्य, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई
१२. अपर मुख्य सचिव, क्रीडा विभाग, यांचे स्वीय सहायक.
१३. प्रधान सचिव, शालेय शिक्षण विभाग यांचे स्वीय सहायक.
१४. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१५. महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ - मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर.
१६. महालेखापाल (लेखा), महाराष्ट्र-१ - मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर.
१७. उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा, शिवछत्रपती क्रीडा संकुल, म्हाळुंगे-बालेवाडी, पुणे.
१८. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे (संचालनालयाद्वारे)
१९. लेखाधिकारी, क्रीडा व युवक सेवा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे (संचालनालयाद्वारे)
२०. कार्यासन अर्थसंकल्प, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई,
२१. निवड नस्ती (क्रीयुसे-१).